**नियोजन विभागाच्या अधिनस्त अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अधिकाऱ्याचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन/ पुनर्विलोकन/ संस्करण अधिकारी निश्चित करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२५/प्र.क्र.३६/का.१४२६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ एप्रिल, २०२५.

**वाचा** :- १) सा.प्र.वि., शासन निर्णय क्र.सीएफआर-१२१०/प्र.क्र.४७/२०१०/१३, दि.१ नोव्हेंबर, २०११.
२) सा.प्र.वि., शासन निर्णय क्र.सीएफआर-१२११/प्र.क्र.२१७/१३, दि.१७ डिसेंबर, २०११.
३) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.गोपअ-१०१३/प्र.क्र.१३३/का.१४२६, दि.२३ मे, २०१३.
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.८/का.१४२६, दि.२८/०६/२०२२.
५) सा.प्र.वि. आदेश अ.शा.प.क्र.एईओ-११२४/५/२०२४/भाप्रसे-१, दि.२१/१२/२०२४.

**शासन परिपत्रक :-**

नियोजन विभागाच्या वरील संदर्भ क्र. ३ येथील दि.२३/०५/२०१३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये या विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालाचे मुख्यालय व त्याची क्षेत्रीय कार्यालये येथील अधिकारी व कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासंदर्भात मुख्यालय व क्षेत्रीय कार्यालयांसाठी प्रतिवेदन/पुनर्विलोकन/संस्करण अधिकारी निश्चित करण्यात आले आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.१२.२०२४ रोजीच्या आदेशांन्वये आयुक्त, अर्थ व सांख्यिकी या नवीन पदावर भाप्रसे अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय दि.२८/०६/२०२२ अन्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या ९९६ पदांच्या आकृतीबंधास मान्यता देण्यात आली आहे. सुधारीत आकृतीबंधानुसार संचालनालयाच्या संरचनेमध्ये बदल झाला असून, त्यानुसार नव्याने प्रतिवेदन/पुनर्विलोकन/संस्करण अधिकारी निश्चित करणे आवश्यक आहे.

सबब, या विभागाचे संदर्भ क्र. ३ येथील दि. २३ मे, २०१३ चे परिपत्रक व त्याअनुषंगीक आदेश या परिपत्रकांन्वये अधिक्रमीत करण्यात येत आहेत.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, अर्थ व सांख्यिकी संचालनालय (मुख्य कार्यालय), प्रादेशिक कार्यालये, जिल्हा सांख्यिकी कार्यालये, जिल्हा नियोजन समिती, उपायुक्त (नियोजन) (विभागीय आयुक्त कार्यालय), मानव विकास आयुक्तालय तसेच जिल्हा नियोजन मानव विकास समिती येथील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासंदर्भात नव्याने प्रतिवेदन/पुनर्विलोकन/संस्करण करणारे अधिकारी सोबतच्या सहपत्राप्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत.

३. अर्थ व सांख्यिकी संचालनालय व त्याची क्षेत्रीय कार्यालये येथे कार्यरत असणाऱ्या गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्याबाबतचे आदेश आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांचे स्तरावरून निर्गमित करावेत व त्याची एक प्रत शासनास अग्रेषित करावी.

४. संबंधित प्रतिवेदन/पुर्नविलोकन अधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये निर्गमित केलेल्या सूचनांचे पालन करुन त्यांच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल विहित कालावधीत लिहून पूर्ण होतील याची खबरदारी घ्यावी.

५. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०४२८१५५४२३३८१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHARUSHILA
DEVENDRA CHAUDHARI

Digitally signed by CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A75E4CF904B78F2AE051843EA1BA6106A393C2B0CF60FE03C945913B2BAE935F, cn=CHARUSHILA DEVENDRA CHAUDHARI
Date: 2025.04.28 15:55:34 +05'30'

**( चारूशीला चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
२. सर्व विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालये,
३. सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी यांचे कार्यालय,
४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
५. सहसंचालक/उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, (नवी मुंबई/पुणे/नाशिक/छत्रपती संभाजीनगर/नागपूर/अमरावती)
६. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय,
७. उप आयुक्त, मानव विकास, मानव विकास आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर,
८. सहाय्यक आयुक्त, मानव विकास, मानव विकास आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर,
९. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,
१०. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास),
११. सर्व जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालये,
१२. सर्व सह/उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. सर्व मंत्रालयीन विभाग – त्यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांच्या विभागात तसेच विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालये, स्वायत्त संस्था येथे कार्यरत असणाऱ्या अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अधिकाऱ्यांच्या/कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.
१४.निवडनस्ती.

नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकिर्ण-२०२५/प्र.क्र.३६/का.१४२६,

दिनांक २८/०४/२०२५ सोबतचे सहपत्र

**नियोजन विभागाच्या अधिनस्त अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील अधिकाऱ्याचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन/ पुनर्विलोकन/ संस्करण अधिकारी याबाबतचा तक्ता**

## १) अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय –

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | संचालक (S-२९) | आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग |
| २ | अपर संचालक (S-२७) | संचालक | आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय | |
| ३ | सह संचालक (S-२५) | अपर संचालक | संचालक | |
| ४ | मुख्य संशोधन अधिकारी (S-२५ ) | अपर संचालक | संचालक | |
| ५ | उपसंचालक (S-२३) | यथास्थिती सहसंचालक/ अपर संचालक | यथास्थिती अपर संचालक/ संचालक | |
| ६ | वरिष्ठ संशोधन अधिकारी (S-१६) | अपर संचालक | संचालक | |
| ७ | लेखाधिकारी (S-१६) | उपसंचालक | संचालक | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय |
| ८ | स्वीय सहायक (S-१६) | यथास्थिती आयुक्त/संचालक | यथास्थिती आयुक्त/संचालक | |
| ९ | संशोधन/सांख्यिकी अधिकारी (S-१६) | यथास्थिती उपसंचालक/ सहसंचालक | यथास्थिती सहसंचालक/ संचालक | |

## २) अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय –

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | सह संचालक (S-२५ ) | अपर संचालक (समन्वय) | संचालक | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग |
| २ | उप संचालक (S-२३) | सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय | संचालक | |
| ३ | संशोधन/सांख्यिकी अधिकारी (S-१६) | उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय | सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय |

## ३) जिल्हा सांख्यिकी कार्यालय –

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय | सह संचालक, प्रादेशिक कार्यालय | संचालक | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नियोजन विभाग |
| २ | संशोधन/सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय | उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय | सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय | |

## ४) जिल्हा नियोजन समिती –

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा नियोजन अधिकारी | जिल्हाधिकारी | उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग |
| २ | सहायक जिल्हा नियोजन अधिकारी | जिल्हा नियोजन अधिकारी | जिल्हाधिकारी | |

## ५) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय —

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी | संस्करण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय | विभागीय आयुक्त | आयुक्त,अर्थ व सांख्यिकी संचालनालय | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग |
| २ | संशोधन/सांख्यिकी अधिकारी | उपायुक्त (नियोजन) | आयुक्त,अर्थ व सांख्यिकी संचालनालय | संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय |

## ६) मानव विकास आयुक्तालय —

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>प्रतिवेदन अधिकारी</th><th>पुनर्विलोकन अधिकारी</th><th>संस्करण अधिकारी</th></tr>
<tr><td>१</td><td>सह आयुक्त</td><td>आयुक्त, अर्थ व सांख्यिकी</td><td>अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग</td><td rowspan="2">अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग</td></tr>
<tr><td>२</td><td>उप आयुक्त</td><td>सह आयुक्त</td><td>आयुक्त,अर्थ व सांख्यिकी</td></tr>
</table>

## ७) जिल्हा नियोजन मानव विकास समिती —

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>प्रतिवेदन अधिकारी</th><th>पुनर्विलोकन अधिकारी</th><th>संस्करण अधिकारी</th></tr>
<tr><td>१</td><td>जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास)</td><td>जिल्हाधिकारी</td><td>आयुक्त,अर्थ व सांख्यिकी</td><td rowspan="2">अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नियोजन विभाग</td></tr>
<tr><td>२</td><td>सहायक जिल्हा नियोजन अधिकारी</td><td>जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास)</td><td>जिल्हाधिकारी</td></tr>
</table>

.............